जालना येथे नियोजित जिल्हा कारागृह बांधण्यासाठी प्रशासकीय मान्यता देणेबाबत

**महाराष्ट्र शासन**

गृह विभाग

शासन निर्णय क्र. बीएलडी-४१२०/१/प्र.क्र.४४/पीआरएस-२

मंत्रालय, मुंबई-३२,

दिनांक :- १२ नोव्हेंबर, २००३

वाचा :- कारागृह उपमहानिरिक्षक (मुख्यालय), कारागृह महानिरीक्षणालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र.बीएलडी/जालना/१९९२-९३/क-३, दि. २८.२.२००० व दि. २५.२.२००३

प्रस्तावना :- जालना येथे नियोजित जिल्हा कारागृह वर्ग-२ बांधण्याकरिता रु. १५,६८,६४,०००/- एवढ्या खर्चाचा प्रस्ताव कारागृह उपमहानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी प्रशासकीय मान्यतेसाठी शासनास सादर केला असून, सदर प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. प्रस्तुत प्रस्ताव सन १९९८-९९ च्या दरसूचीवर आधारीत असून रु. १५,६८,६४,०००/- एवढ्या खर्चाच्या नकाशे व अंदाजपत्रकातील वर्कचार्ज, भूनियंत्रण व टर्नओव्हर टॅक्स ह्या अनुज्ञेय नसलेल्या तीन बाबी वगळून रु. १५,१९,०३,१४३/- इतक्या खर्चास सार्वजनिक बांधकाम विभागाने प्रशासकीय मंजूरी दिली आहे. त्याचप्रमाणे वित्त विभागानेही विहित केलेल्या कार्यपध्दतीनुसार निधी उपलब्ध झाल्यानंतरच बांधकामास सुरुवात करण्यात यावी या अटीवर सदर खर्चास मान्यता दिली आहे.

शासन निर्णय :- जालना येथे नियोजित कारागृह वर्ग-२ बांधण्याकरिता कारागृह उप महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी सादर केलेल्या रुपये १५,६८,६४,०००/- च्या प्रस्तावातील वर्कचार्ज, भूनियंत्रण व टर्नओव्हर टॅक्स या अनुज्ञेय नसलेल्या बाबी वगळून येणारा खर्च रुपये १५,१९,०३,१४३/- (रुपये पंधरा कोटी एकोणीस लक्ष तीन हजार एकशे त्रेचाळीस फक्त) ला शासनाने विहित केलेल्या कार्यपध्दतीनुसार निधी उपलब्ध झाल्यानंतरच बांधकामास सुरुवात करण्यात यावी या अटीवर प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. यासाठी होणारा खर्च "२०५६, तुरुंग, १०१ तुरुंग (००)(०९), कारागृह सुधारणा योजना (केन्द्र पुरस्कृत) (योजनेतर) (२०५६-०१८-९) तत्समत" या लेखाशिर्षाखाली मजूर होणाऱ्या अनुदानातून भागविण्यात यावा.

3. हा शासन निर्णय सार्वजनिक बांधकाम विभाग यांच्या संमतीने व वित्त विभागाचे अनौपचारीक संदर्भ क्र.९९०/२००3/व्यय-८, दि. १५.१०.२००3 अन्वये त्या विभागाच्या सहमतीने/मजूरीने निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

(र. ना. माळी)
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन, गृह विभाग**

प्रत,

- कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे.
- कारागृह उपमहानिरीक्षक (मुख्यालय), महाराष्ट्र राज्य, पुणे.
- कारागृह उपमहानिरीक्षक, मध्य विभाग, औरंगाबाद.
- मुख्य अभियता, सार्वजनिक बांधकाम विभाग, औरंगाबाद.
- कार्यकारी अभियता, सार्वजनिक बांधकाम विभाग, विभाग क्र. २, जालना.
- महालेखापाल, महाराष्ट्र (लेखा व अनुज्ञेयता)-१, मुंबई.
- महालेखापाल, महाराष्ट्र (लेखा व परिक्षा)-१, मुंबई.
- महालेखापाल, महाराष्ट्र (लेखा व अनुज्ञेयता)-२, नागपूर.
- महालेखापाल, महाराष्ट्र (लेखा व परिक्षा)-२, नागपूर.
- जिल्हा कोषागार अधिकारी, जालना / औरंगाबाद.
- अवर सचिव (बीयुडी-१), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
- सार्वजनिक बांधकाम विभाग (इमारत-२), मंत्रालय, मुंबई-३२.
- वित्त विभाग, व्यय-८, मंत्रालय, मुंबई-३२.
- निवड नस्ती.

D:\Yogesh\November\27